**महाराष्ट्र विकास सेवा गट-ब (राजपत्रित) अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, मुदतपूर्व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांक : मविसे-१०१७/प्र.क्र.३५/२०१७/आस्था-३ अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १२ मे २०१७.

**वाचा :-**

१) मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दि.३१.१०.२०१३ रोजी दिलेला निर्णय.

२) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दिनांक ३१.१.२०१४.

**प्रस्तावना :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने संदर्भाधीन क्र.१ नुसार दिलेल्या निदेशाचे पालन करण्यासाठी आणि राज्य शासनाने संदर्भाधीन क्र.३ नुसार घेतलेल्या निर्णयानुसार ग्राम विकास विभागाच्या नियंत्रणाखालील महाराष्ट्र विकास सेवा गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना (सरळसेवा), मुदतपूर्व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

ग्राम विकास विभागाच्या नियंत्रणाखालील महाराष्ट्र विकास सेवा गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना (सरळसेवा), मुदतपूर्व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (ग्राम विकास व पंचायत राज), ग्राम विकास व जलसंधारण विभाग | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (जलसंधारण व रो.ह.यो.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| ३. | सह / उप सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |

सदर नागरी सेवा मंडळ (१) सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्वात येईल. सदर मंडळ महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना (सरळसेवा) व प्रशासकीय कारण/ विनंती या अनुषंगाने मुदतपूर्व बदल्यांच्या शिफारशींबाबतच्या बाबी सक्षम प्राधिकाऱ्यांस शिफारस करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१२१५३५१२९३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Dattatraya Shinde

Digitally signed by Vijay Dattatraya Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabf0ce38fdf553beb9497649 20592a97832b6399cb7060200d032e1 27e455f1, cn=Vijay Dattatraya Shinde
Date: 2017.05.12 17:35:12 +05'30'

( वि.द.शिंदे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. मंत्री आणि मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा, विधान भवन, मुंबई,
५. सर्व संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
८. विभागीय आयुक्त (सर्व)
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१०.वित्त विभाग (अर्थसंकल्प-३ / वित्तीय सुधारणा / सेवा-९ / व्यय-१५) मंत्रालय, मुंबई
११.सामान्य प्रशासन विभाग (कार्या-१०/ कार्या-१२ /कार्या-१६ब), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने
१४.निवड नस्ती (कार्यासन आस्था-३अ)